**महानगरपालिका / नगरपरिषदांमध्ये काम करणाऱ्या नगर रचना व मुल्यनिर्धारण विभागाच्या अधिकाऱ्यांची कार्ये व कर्तव्यांबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक : टिपीव्ही. १९०८ / ११८४ / प्र. क्र. १ / ०९ / नवि-२७
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ जानेवारी २०१०

**संदर्भ :-** (१) शासन निर्णय, न. वि. व सा. आ. वि. क्रमांक टिपीव्ही. १०७९ / ४१२८ / सीआर-२१७५ / युडी-६, दिनांक २९ ऑक्टोबर १९८०.

(२) शासन परिपत्रक, न. वि. वि., न. वि. व सा. आ. वि. क्रमांक टिपीव्ही. १०७९ / ४१२८ / सीआर- २१७५ / युडी-६, दिनांक ९ डिसेंबर १९८०.

**प्रस्तावना :**

राज्यातील विविध महानगरपालिका / नगरपरिषदांमध्ये नगर रचना विषयक बाबी हाताळण्यासाठी शासकीय आस्थापनेवर अथवा प्रतिनियुक्तीवर नगर रचना विभागातील विविध संवर्गातील अधिकारी कार्यरत आहेत. त्यामुळे संदर्भिय शासन निर्णय क्रमांक १ व २ अन्वये 'अ' वर्ग नगरपरिषदांमध्ये शासकीय आस्थापनेवर नगर रचनाकार पदांची निर्मिती करून त्यांची कार्ये व कर्तव्यांबाबत आदेश निर्गमित केलेले आहेत. तथापि, महानगरपालिका / नगरपरिषदांमध्ये शासकीय आस्थापनेवर अथवा प्रतिनियुक्तीने कार्यरत असलेल्या उप संचालक, नगर रचना; सहायक संचालक, नगर रचना व नगर रचनाकार पदावरील अधिकाऱ्यांची कार्ये व कर्तव्ये याबाबत अद्याप आदेश निर्गमित करण्यात आले नसल्याने ती ठरविण्याचा प्रस्ताव शासन विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u> :**

संदर्भ क्रमांक १ व २ चे शासन निर्णय अधिक्रमित करून राज्यातील महानगरपालिका / नगरपरिषदांमध्ये शासकीय आस्थापनेवर अथवा प्रतिनियुक्तीवर कार्यरत असणाऱ्या नगर रचना विभागातील उप संचालक, नगर रचना; सहायक संचालक, नगर रचना; नगर रचनाकार व सहायक नगर रचनाकार यांची नगर रचनाविषयक कार्ये व कर्तव्ये पुढीलप्रमाणे राहतील :-

(१) **प्रशासकीय कार्यपद्धती :**

महानगरपालिका / नगरपरिषदांमधील उप संचालक, नगर रचना; सहायक संचालक, नगर रचना; नगर रचनाकार व सहायक नगर रचनाकार हे त्या त्या महानगरपालिका / नगरपरिषदांमधील नगर रचना विभागाचे प्रमुख म्हणून काम पाहतील व महानगरपालिका आयुक्त / मुख्याधिकारी यांना थेट अहवाल सादर करतील.

(२) **विकास योजनेची अंमलबजावणी :**

(अ) विकास योजना अंमलबजावणीसाठी प्राथम्य यादी तयार करून त्यानुसार अंमलबजावणीसाठी आवश्यक ते तांत्रिक सहकार्य करणे.

(ब) केंद्र शासन पुरस्कृत व राज्य शासनाच्या विविध योजनांखाली अर्थसहाय्य मिळविण्यासाठी प्रस्ताव तयार करणे व त्या अनुषंगाने शासनास वेळोवेळी पत्रव्यवहार करणे.

(क) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम / भूसंपादन अधिनियमांतर्गत विकास योजनेच्या प्रस्तावाखाली जमिनीच्या भूसंपादनासाठी आवश्यक ती कार्यवाही करणे, खाजगी वाटाघाटीने जमीन संपादनामध्ये तांत्रिक अभिप्राय देणे, संपादित करावयाच्या जमिनीच्या मुल्यांकनाचा प्राथमिक अहवाल तयार करणे.

(ड) विकास योजनेबाबत आवश्यकतेनुसार फेरबदलाचे प्रस्ताव तयार करणे.

(इ) महानगरपालिका / नगरपालिकेला नगर रचना विषयाशी संबंधित प्रकरणात तांत्रिक सल्ला देणे.

(फ) विकास योजनेच्या अंमलबजावणीबाबतची सर्व प्रकरणे हाताळणे.

(३) **विकास नियंत्रण :**

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या कलम ४४ अंतर्गत प्राप्त विविध बांधकाम परवानगी, विकास परवानगी, अभिन्यास मंजुरीच्या प्रकरणांची छाननी करणे; आयुक्त, म.न.पा. / मुख्याधिकारी, नगरपालिका / नगरपरिषदा यांच्या मंजुरीने प्रारंभ प्रमाणपत्र, बांधकाम पुर्णत्वाचे प्रमाणपत्र, भोगवटा प्रमाणपत्र इ. अनुषंगिक कामाबाबत कार्यवाही करणे.

(४) महानगरपालिका / नगरपालिका / नगरपरिषदांतील प्रभाग अधिकाऱ्यांना व इतर संबंधितांना अनधिकृत बांधकामाच्या प्रकरणात महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियमाच्या कलम ५२, ५३, ५४ व ५५ च्या अनुषंगाने सल्ला व मार्गदर्शन देणे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

२८.०१.२०१०

**( सुरेश काकाणी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

*प्रत :*

महालेखापाल-१, मुंबई / महालेखापाल-२, नागपूर.
प्रधान सचिव, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
सचिव-२, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
सह संचालक, नगर रचना, पुणे.
विभागीय आयुक्त, पुणे / औरंगाबाद / नाशिक / नागपूर / नांदेड / कोकण विभाग, नवी मुंबई / अमरावती.
आयुक्त, सर्व महानगरपालिका.
सर्व जिल्हाधिकारी.
उप संचालक, नगर रचना, पुणे / औरंगाबाद / नाशिक / नागपूर / कोकण विभाग, नवी मुंबई / अमरावती.
सहायक संचालक, नगर रचना / नगररचनाकार (सर्व जिल्हे).
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका / नगरपरिषदा.
सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
संगणक कक्ष, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
निवड नस्ती (नवि-२७).



-------------